गेलें होतें. अपार संपत्तीपासून होणारे वाईट परिणाम जे बलहीनत्व व दुराचारप्रीति यांचा त्या काळीं जिकडे तिकडे पुष्कळ प्रादुर्भाव झाला होता. अशा वेळींही 'भांगेंत तुळस' या ह्मणीप्रमाणें कोणी कोणी सज्जन व थोर मनुष्य विरलतेनें आढळतातच. अशांपैकींच त्या वेळेस सिसरो हा होता. चोहोंकडे व विशेषतः श्रीमंत लोकांच्या बरोबर नाना तऱ्हेचे दुराचार माजले असतां, व पूर्वींच्या रोमन् लोकांचे सर्व सद्‍गुण नष्ट होत चालले असतां, सिसरोचे ठायीं मात्र पूर्वींच्या लोकांप्रमाणें, स्वदेशप्रीति, सदाचरण, धर्मनिष्ठा हे गुण वसत होते. तर तात्पर्य काय कीं, वरील गुणांनीं प्रस्तुत वक्त्याचें मन अत्यंत शुद्ध राहिलें असल्यामुळें त्यानें वेरिस्, क्याटिलैन, आंटनी, यांवर जो तडाका उडवला तो उडाला. आपला मतलब साधण्याकरितां किंवा प्रतिष्ठा मिळविण्याकरतां जर तो सभाग्रस्थानीं उभा राहून पांडित्य करता, तर सला, सीजर अशांसही जो त्याचा धाक वाटे व क्याटिलैन, आंटनी अशांसारख्यांस त्यानें जें पळवून लावलें, तें कधींही झालें नसतें. तिसरें उदाहरण इंग्लंडांतील वक्त्यांचें. या वक्तृवर्गांत प्रमुख जो बर्क त्याविषयीं मागें अठराव्या अंकांत बराच मजकूर लिहिला आहे. त्यावरून आपल्या देशाशीं त्याचा बिलकुल संबंध नसतां केवळ भूतदयेनें व अंतःकरणाच्या कळवळ्यानें त्यानें इकडची अतोनात माहिती मिळवली, सात वर्षें हेस्टिंग्स् याचा पार्लमेंट् सभेंत सारखा पिच्छा पुरवला, व सात हजार कोस दूर असणाऱ्या हिंदुस्थानांतील लोकांचा स्वतःच वकील बनून त्यांच्या तर्फेनें पहिल्या गवर्नर् जनरलास आरोपी ठरवून पार्लमेंटांतील पिंजऱ्यांत उभा केला. या सर्व गोष्टींवरून त्याच्या मनाचा थोरपणा व शुद्धपणा स्पष्ट दिसून येतो. हेस्टिंग्स् याजवर त्यानें सात वर्षें सारखा जो गहजब उडवून दिला याचें कारण त्यांची पूर्वींची कांहीं चुरस होती ती होय, असें जे कित्येक

ह्मणत असत त्याचें मेकॉलेनें आपल्या निबंधांत खंडन करून टाकलें आहे, व असें दर्शविलें आहे की प्रस्तुत वक्त्यानें बंगाल लुटलेल्या प्रतिष्ठित दरवडेखोरावर जो येवढा विभु रचला तो केवळ त्याच्या राक्षसी कृत्यांचा त्यास अतोनात संताप येऊन गेल्यामुळेंच होय.[१] असो; तर वर जो वक्तृत्वास अत्यंत आवश्यक ह्मणून गुण सांगितला तो या तिसऱ्या महावक्त्याच्या ठायींही अगदीं परिपूर्ण होता. त्याच्या योगानेंच त्या सगळ्या प्रकरणास अतिशयित शोभा येऊन तो प्रसंग एकंदर जगाच्या चिरकाळ ध्यानांत राहण्यासारखा झाला आहे. वरील गुणानें बर्कच्या वक्तृत्वाचें तेज किती वाढलें व त्याच्या प्रतिपक्ष्यांस तें केवढें दुःसह झालें याचा दाखला आह्मांपाशीं एक फार पसंत आहे. तो दुसऱ्या तिसऱ्याचा नव्हे; तर खुद्द खाशा स्वारीचाच आहे. हिंदुस्थानाचे पहिले अधिपति एक गुडघा टेंकून पार्लमेंटाच्या पिंजऱ्यांत जेव्हां उभे राहिले, व पहिल्यानें बर्क यानें फिर्यादीचीं कलमें वाचून व एकंदर मोकद्दम्याचें स्वरूप सर्वांच्या लक्षांत आणून देऊन मुख्य आरोपीवर जेव्हां भडिमार चालवला, तेव्हां त्याच्या मनाची जी स्थिति झाली ती त्यानें येणेंप्रमाणें लिहून ठेवली आहे. तो ह्मणतो, "त्या वेळेस एक अर्धा तासभर मी केवळ आश्चर्यस्तब्ध होत्साता वक्त्याकडे पाहत होतों; आणि त्याचे

---

१. प्रस्तुत विषयाच्या संबंधाचा मेकॉलेचा लेख फार उत्कृष्ट आहे ह्मणून मागें एके ठिकाणीं सांगितलेंच आहे. तो वरील वक्त्याची योग्यता चांगली ध्यानांत येण्याकरितां समग्र वाचण्याविषयीं आह्मी येथें आमच्या वाचकांस पुनः शिफारस करतों. वॉरन् हेस्टिंग्स् याच्या एकंदर वर्तणुकीविषयीं व कृत्यांविषयीं प्रस्तुत ग्रंथकाराचे गोड गोड व लडिवाळपणाचे लेख कोणत्याही सत्यपक्षपाती व न्यायाभिमानी मनुष्यास, व त्यांतून एतद्देशीय वाचकांस तर, बिलकुल पसंत पडणार नाहींत हें खरें; तरी वरील निबंध मोठ्या सफाईनें लिहिला असल्यामुळें व वरच्यासारखीं उत्कृष्ट स्थळें त्यांत असल्यामुळें इकडील लोकांनीं तो विशेषेंकरून वाचण्यासारखा आहे.

शब्द माझ्या हृदयास इतके टोंचले कीं, कांहीं वेळपर्यंत पृथ्वीच्या पाठीवर माझ्यासारखा दुष्ट कोणी मनुष्य नसेल असें मला वाटत होतें !''

असो; बर्कच्या खालोखालचे मोठे नामांकित वक्ते जे दोघे पिट् व फॉक्स् वगैरे दुसरे कित्येक वक्ते, त्यांचीही अशीच गोष्ट होय. पहिला पिट् ऊर्फ लॉर्ड च्याथम् याचें उदाहरण तर वरील सिद्धांताचा प्रत्यय दाखवणारें व त्याचें दृढीकरण करणारें मोठेंच उत्कृष्ट आहे. हा जेव्हां ' हौस ऑफ् कॉमन्स् ' ( मध्यम प्रतीच्या लोकांची सभा ) हींत पहिल्यानें बोलूं लागला त्या वेळेस राजाचे दिवाण सर राबर्ट् वॉल्पोल् हे सगळा राज्यकारभार आपण हांकीत होते. वरील सभा केवळ नांवाला मात्र असून वॉल्पोल् जी करील ती पूर्वदिशा असा प्रकार होता. राजाचा खजिना स्वाधीन असल्यामुळें लोकांच्या तर्फेनें जो भांडायाला उठेल त्याची मूठ गच्च भरून दिवाण साहेबांनीं त्यास खालीं बसवून टाकावें. या श्लाघ्य कृत्यांत त्यास इतकें यश आलें कीं, ' प्रत्येक मनुष्याची ज्याची त्याला किंमत आहे ' [१] अशी त्यांनीं एक ह्मणच करून टाकली. ती यांच्या नांवावर अद्याप चालत आहे. असो; पण सरतेशेवटीं वरील प्रख्यात वक्ता मात्र त्यांस मोठा वस्ताद भेटला. त्यावर त्यांचे कुटिल प्रयोग सर्व

---

१. ' Every man has his own price. ' या ह्मणीवरून खरा प्रामाणिकपणा ह्मणून जगांत मुळींच नाहीं, अशी वरील प्रधानाची समजूत होती हें स्पष्ट दिसतें. हें अर्थातच सर्वांशीं खरें नाहीं. असें ह्मणणें ह्मणजे एकंदर मनुष्यजातीची अब्रू घेणें होय. असो. ' हितोपदेशांत ' अशाच अर्थाची पण निराळ्या अभिप्रायानें केलेली एक उक्ति आहे.

पंचभिर्याति दासत्वं पुराणैः कोऽपि मानवः ।
कोऽपि लक्षैः कृती कोऽपि लक्षैरपि न लभ्यते ॥

व्यर्थ होऊन त्यांस आपली आवडती ह्मण माघारी घ्यावी लागली. पिट् हा त्या वेळेस वयानें लहान होता, पण वरील अमूल्य गुणास्तव त्याचें वजन चोहोंकडे एकदम असें बसून गेलें, व त्याच्या सरस्वतीच्या ओघास त्याच्या योगानें अशी उद्दामता प्राप्त झाली कीं, वरील दिवाणाचें तेज या नव्या वक्त्यापुढें लोपत चाललें. सरतेशेवटीं त्यास आपल्या हुद्द्याचा राजीनामा देणें भाग पडून सगळें राज्यतंत्र पिट् याच्या हातीं आलें. तें त्यानें कांहीं वर्षें मोठ्या दक्षतेनें सांभाळून आपल्या नांवाचा सगळ्या जगभर जयजयकार करून सोडला आणि त्याच वेळेपासून कॉमन्स लोकांच्या सभेचें जें राज्यांत वजन आहे तें बसलें.

असो; तर याचप्रमाणें मनाचें शुद्धत्व हा वक्त्यास अवश्य असणाऱ्या गुणांपैकीं पहिला होय. जें श्रोत्यांस सांगायाचें तें वक्त्यास पूर्णपणें भासून त्यानें अंतःकरणाच्या केवळ कळवळ्यानें जर प्रगट केलें नसेल, तर तें ऐकणारांच्या हृदयास विशेष ह्मणण्यासारखा विकार करील हें मुळींच संभवत नाहीं. त्यानें ओढून ताणून आणलेल्या आवेशास कांहीं अतज्ज्ञ लोक कदाचित् भुलून जाऊन फसतील; पण खऱ्या मार्मिक श्रोत्यांस केवळ लटपटपंची केल्यानें लेशमात्रही द्रव येणार नाहीं. यास्तव 'पुराणांतील वांगीं पुराणांत' असा कपटभाव मनांत धरून जो वक्तृत्व करील त्यानें तें न केलेलें बरें; कारण तशानें त्याचे श्रम तरी वांचतील. आपल्या भाषेंत एक उत्कृष्ट ह्मण आहे, कीं 'जाळावांचून कड नाहीं; आणि मायेवांचून रड नाहीं.' तर या लहानशा वाक्यांत येथवर सांगितलेल्या सर्व गोष्टींचा थोडक्यांत समावेश होतो.

४. वक्त्याच्या अंगीं अवश्य पाहिजे असा दुसरा गुण विद्वत्व होय,ह्मणजे ज्याविषयीं बोलायाचें त्याविषयींची पूर्ण माहिती असून साधकबाधक प्रमाणें त्यास सारीं अवगत पाहिजेत. शिवाय

अनेक ग्रंथांच्या अवलोकनानें जें बहुश्रुतत्व अंगीं येतें तेंही त्यास अनुकूल पाहिजे. अशी सर्व सामग्री असली ह्मणजे ज्या विषयावर बोलायाचें त्याचें त्यास परिपूर्णतेनें उद्घाटन करतां येऊन श्रोत्यांचें मन संशयमुक्त होतें, व केलेलें भाषण त्यांच्या हृदयावर पूर्णपणें ठसतें. वर सांगितलेले तिन्ही वक्ते याप्रमाणेंच मोठे विद्वान होते, व त्यांच्या कोटिक्रमापुढें कोणाचाही टिकाव निघत नसे. वरील गुण मुख्यत्वेंकरून वकिलांच्या अंगीं अवश्य पाहिजेत. सिसरो तर मूळचा वकीलच होता; व बर्कनेंही पार्लमेंटांत आमच्या देशाची एक पैही फी न घेतां वकिलीच केली; आणि काळ्या गोऱ्या लोकांचा मोकदमा चालला असतां जसे अद्याप फैसले झालेले दृष्टीस पडतात तसाच वरील महाप्रसंगींही येवढें अवडंबर रचलें असतांही झाला. असो; या ठिकाणीं विख्यात तत्त्वज्ञ जो सर् फ्रयान्सिस् बेकन् त्याच्या वकिलीविषयीं प्रसिद्ध कवि बेन् जॉनसन् यानें लिहिलेला एक उत्कृष्ट चुटका सरतेशेवटीं देतों. हा कवि महाविख्यात जो शेक्सपीयर त्याचा जिवलग मित्र होता, व त्याच्याप्रमाणें याचीही कीर्ति त्याच्या नाटकांवरच आजपर्यंत चालत आली आहे. हा बेकन् याच्याहून पुष्कळ वडील होता; तरी त्याच्या कीर्तीचा व वैभवाचा त्यास तिळमात्रही मत्सर न वाटतां त्यानें बेकन्च्या स्तुतिपर पुष्कळ मजकूर लिहून ठेवला; तो अद्याप प्रसिद्ध आहे. बेकन्च्या वक्तृत्वाविषयीं तो येणेंप्रमाणें लिहितो—“ माझ्या वेळीं एक उत्कृष्ट वक्ता चोहोंकडे गाजत होता. त्याचें भाषण मोठें प्रौढ असे. ज्या वेळेस तो विनोद करी त्याखेरीज करून त्यांचें भाषण नेहेमीं अतिशय गंभीरतेचें असे. त्याच्यासारखा बेताबातानें, युक्तीस धरून, व अर्थगांभीर्यानें बोलणारा माझ्या पाहण्यांत दुसरा कोणी आला नाहीं; त्याच्या बोलण्यांत वायफळ असा एक शब्द किंवा एक अक्षरही नसे. ज्या त्या शब्दास त्याचीच अशी कांहींना कांहीं

तरी खुबी असायाचीच. त्याच्या श्रोत्यांतून एकाद्यानें जर क्षणभर एकीकडे पाहिलें किंवा कोणाला खोकला आला, तर तितक्यांतही कांहीं गहन अर्थाचे शब्द निघून जाऊन त्यांची त्यास हळहळ वाटावी. तो बोलायाला उठला कीं सर्वांनीं स्तब्ध होऊन त्याच्या बोलण्याकडे एकाग्र चित्त द्यावें; आणि न्यायाधिशांचे रागद्वेष केवळ त्याच्या स्वाधीन असत, त्यांच्या साऱ्या मनोवृत्ति या वक्त्याच्या जशा काय मुठींत होत्या; साऱ्या श्रोत्यांस असा नेहेमीं धाक वाटे कीं, हा इतक्यांतच आटपतो कीं काय !''[१] असो; तर ही गहनार्थता व युक्तिमत्त्व पुरतेपणीं साधण्यास वक्त्याची बुद्धि कुशाग्र व व विशाल असून तिच्या योगानें त्यानें मोठी विद्वत्ता संपादन करून ठेवली असली पाहिजे.

५. वरच्यांखेरीज सहृदयत्व, तार्किकता, विषय जुळवण्याची शैली, अर्थविशदत्व, वगैरे जे कित्येक गुण उत्तम वक्त्याचे ठायीं अवश्य असले पाहिजेत, त्यांविषयीं येथें आणखी सविस्तर लिहीत नाहीं; कां कीं, वर सांगितलेल्या दोन्ही गुणांत त्यांचा बराच समावेश होतो; व त्यांचें स्वरुप उत्तम भाषणांकडे नीट लक्ष पुरवलें असतां सर्वांच्या तेव्हांच ध्यानांत येणारें आहे. शिवाय समग्र विषयाचें श्रोत्यांस सुखानें ग्रहण करतां येई अशी त्याची रचना कशी करावी, व त्यावर केलेले प्रतिपादन सर्वांस सुबोध होण्यास काय करावें याविषयीं नियम सांगणें कठिण आहे. अशा पुष्कळ गोष्टी असतात कीं, त्या चांगल्या करतां येणें हें केवळ अनुकरणसाध्य मात्र असतें; त्यांविषयीं नियम ह्मटले ह्मणजे करतांही येत नाहींत, व केले तर ते सर्वव्यापक होत नसल्यामुळें त्यांपासून तादृश उपयोगही होत नाहीं तर अशा प्रकारच्याच वरील दोन

---

१. प्रस्तुत विषयाच्या आरंभीं जें संस्कृत पद्य घातलें आहे त्यांतलि पुष्कळ अर्थ वरच्या वर्णनाशीं मोठ्या चमत्कारिक रीतीनें जमतो ।

गोष्टी होत. यास्तव ज्या कोणास त्या शिकणें असतील त्यांनीं प्राचीन व अर्वाचीन काळच्या महावक्त्यांचीं भाषणें लक्षपूर्वक वाचावीं व त्यांवर मनन करावें येवढाच काय तो चांगलासा उपाय आहे.

६. याप्रमाणें वक्त्याच्या अंगीं स्वभावतःच जे गुण असले पाहिजेत त्यांचें निरूपण झालें. आतां सरतेशेवटीं या कलेपासून उपयोग काय याविषयीं लिहून प्रस्तुत विषय आटपतों. हा उपयोग दोन तऱ्हेचा आहे. एक व्यक्तिदृष्ट्या व दुसरा लोकदृष्ट्या. व्यक्तिदृष्ट्या प्रस्तुत कलेचा उपयोग उघडच आहे कीं, ती ज्याजपाशीं वसत असते तो सर्वांस प्रिय व सन्मानार्ह होतो. अशा मनुष्याचा सहवास करण्याविषयीं लोक नेहमीं उत्सुक असतात, व आपल्या भाषणांच्या मोहनीनें तो सर्वांचीं चित्तें आपणास वश करून घेतो. शिवाय हा गुण प्रस्तुत अंकाच्या आरंभीं घातलेल्या पद्यांत सांगितल्याप्रमाणें त्यास मोठा अलंकारही होतो. हा सहज अलंकार त्यास श्रमाशिवाय व निर्भयपणें धारण करतां येऊन यावज्जन्म त्यास शोभादायक होतो. पण इतकेंच नव्हे. एकाद्या शूर सरदारास त्याच्या कमरेस लटकलेली तरवार जशी केवळ शोभाच देते असें नाहीं, तर त्याच्या सामर्थ्याची ती निशाणी असून तिची लकाकी शत्रूंच्या काळजास थरारवीत असते, त्याचप्रमाणें वाक्शस्त्राचें तीव्रत्वही प्रतिपक्षिजनास अत्यंत भयावह असतें. मिलिटसानें सॉक्रेटीसावर द्वेषबुद्धीनें कारस्थान रचून न्यायसभेंत त्या वरचे सगळे बनावट व शुष्क आरोप जेव्हां बोलून दाखवले, तेव्हां सरतेशेवटीं आपल्या पक्षाची दुर्बलता व आपल्या प्रतिपक्ष्याचें बुद्धिसामर्थ्य मनांत आणून न्यायाधिशांस त्यानें विनंति केली कीं, “ महाराज, सॉक्रेटीस शब्दपांडित्यानें आपणास मोहित करील, तर आपण फार सावध असावें; व तो आपणास फसवण्यासाठीं गोड गोड काव्याचीं भाषणें करील, तर आपण त्याचें बोलणें

बहुतकरून खरें मानूं नये." असो; तर याप्रमाणें प्रस्तुत गुणानें मनुष्य भूषित होऊन त्याचें सर्वांवर वजन बसण्यास तो कारण होतो. आतां राष्ट्राच्या संबंधानें पाहा. या संबंधाचीं उदाहरणें मागील अंकांतून ग्रीस, रोम, इंग्लंड् व हिंदुस्थान या देशांतील दिलींच आहेत. त्यावरून एका मनुष्याच्या वक्तृत्वशक्तीचा प्रभाव प्रसंग-विशेषीं किती दृष्टीस पडतो याचा प्रत्यय आमच्या वाचकांस चांगला आलाच असेल. तसलीं उदाहरणें आणखी बहुधां प्रत्येक देशाच्या इतिहासांतूनही देतां येतील. असो; आतां प्रस्तुतच्या देशस्थितीला सांप्रत कलेचा कितीसा उपयोग होईल याविषयीं कांहीं लिहून एकंदर विषयाची परिसमाप्ति करतों.

यापूर्वीं आलीकडे चालू झालेल्या वक्तृत्वोत्तेजनाच्या प्रकारा-विषयीं जें आह्मीं लिहिलें आहे त्यावरून त्या उद्योगाविषयीं आमचें काय मत आहे, व प्रस्तुत कला सुधारणें असल्यास काय केलें पाहिजे, हें आमच्या वाचकांस कळलेंच आहे. त्याविषयीं येथें जास्त सांगण्यासारखें येवढेंच आहे कीं, युरोपांतील कोणताही प्रकार पाहून त्यासारखें येथें करण्याचा प्रयत्न करणें हें फार असमंजस होय. एकाच्या शरीरप्रकृतीला जें मानवलें तें दुसऱ्यास मानवेलच हा जसा नेम धरवत नाहीं, त्याप्रमाणें युरोपच्या स्थितिविशेषाला लागू ज्या गोष्टी त्या इकडे लागतीलच हें कदापि होणार नाहीं. रोम, आथेन्स वगैरे ठिकाणीं लोकसत्तात्मक राज्यप्रकार होता, तेव्हां आंटनी, डिमॉस्थेनीस वगैरे पुरुषांचे जे प्रभाव इतिहासांत दाखल केले आहेत ते तेथें घडण्यांत आले हें सहजच आहे. पण तो नमुना धरून येथें जर तशा गोष्टी बळेंच घडवून आणण्याचा घाट घातला, तर येथें तसली सामग्री काय आहे ? एशियाखंडांतील कोणत्याही राष्ट्रास राजसत्तेखेरीज दुसरा कोणताही प्रकार आजपर्यंत कधींच माहीत झाला नाहीं; व लोकस्वातंत्र्याची कल्पना त्यांच्या

कधीं स्वप्नींही आली नाहीं. रोमन् लोकांस 'राजा'हा शब्दही सहन होत नसून सीजरासारख्यांस त्यांनीं कट करून ठार मारून टाकलें ही गोष्ट येथील लोकांस अतिशय विलक्षण वाटणारी आहे; कीं, ज्याप्रमाणें येवढ्याशा काडतुसाच्या चिरडीवरून बंगाल्यांत झालेला दंगा युरोपियन लोकांस विचित्र वाटला! असो, तर एकंदरींत एका राष्ट्राची प्रकृति दुसऱ्या राष्ट्राच्या प्रकृतीशीं सर्वांशीं कधीं मिळायाची नाहीं. त्यांतून इंग्लंड् व हिंदुस्थान अशा हरएक प्रकारें भिन्न असणाऱ्या देशांविषयीं तर कांहीं बोलायालाच नको. यास्तव वक्ते तयार होऊन त्यांनीं लोकांचीं मनें आपणांकडे ओढून घ्यावीं, व हवा तो फेरफार एकंदर राष्ट्रांत सुरू करावा वगैरे बेत जे आमच्या लोकांच्या मनांत घोळताहेत ते सगळे पुष्कळ अंशीं व्यर्थच होत. वक्तृत्वाचा येवढा प्रभाव येथें दृष्टीस पडूं लागण्यास अद्याप पुष्कळच काळ लोटला पाहिजे; व तितका लोटल्यावरही तो निश्चयानें पडेलच असेंही सांगवत नाहीं. तर याप्रमाणें प्रस्तुत देशस्थितीला वक्तृत्वाची अतिशय आवश्यकता आहे, व तो गुण नसल्यामुळें देशाचें मोठें नुकसान होत आहे, हें मत आमच्या मतें पुष्कळ अंशीं अत्युक्तीचें व असमंजस असें होय.

तेव्हां प्रस्तुत कलेचा उपयोग हल्लीं आमच्या देशास ह्मटला ह्मणजे कविता, चित्रविद्या, इत्यादि इतर कलांप्रमाणेंच होय. ह्मणजे ती आपल्या देशांत वाढली असतां लोकरंजनाचें एक उत्तम साधन होऊन देशास भूषण होणार आहे. तसेंच हल्लीं जे लोककल्याणाचे कित्येक उद्योग चोहोंकडे सुरू झाले आहेत त्यांची वृद्धि करण्यासही तिचा बराच उपयोग होईल खरा; पण तसें होण्यास हल्लींपेक्षां तिचें स्वरूप फार निराळ्या प्रकारानें प्रगट झालें पाहिजे. हल्लीं ज्याप्रमाणें एक वाक्शक्ति व एके रीतीचा धीटपणा येवढीच सामग्री वक्तृत्वास पुरते, तसा प्रकार कामाचा नाहीं. कोणत्याही विषया-

विषयीं जो लोकांस आपल्या मताला मिळवूं पाहणार त्यानें अगोदर तो विषय चांगला समजून घेऊन नंतर मनोवेधक रीतीनें त्याचें प्रतिपादन केलें पाहिजे. असें करतां येण्यास त्यानें कोणतीं साधनें आपणास अनुकूळ करून घेतलीं पाहिजेत तीं मागें सांगण्यांत आलींच आहेत. असें जर न केलें, तर हल्लीं जसें वक्तृत्व बहुधां निष्फळ होतें, किंवा त्यापासून कांहीं निष्पन्न झालेंच तर भलतीं मतें लोकांच्या मनांत अर्धीमुर्धीं शिरून जातात, तसा मात्र प्रकार होईल. असो; तर प्रकृत कलेपासून विद्यमान स्थितींत आपल्या देशांत जो उपयोग होणार तो वरच्या इतका मात्र होईल असें आह्मांस वाटतें.



# वक्तृत्व

## [ टीपा, स्पष्टीकरणाची वाक्यें व टीका इ० इ० ]

पृष्ठ–१

**यथार्थत्वानें**—त्याचा ज्याप्रमाणें अर्थ आहे त्याप्रमाणें. उ० 'वक्तृत्वाचा' साधा अर्थ ' बोलणारेपणा' असा जरी असला तरी वक्तृत्वास लागणाऱ्या गुणांप्रमाणें त्याचा अर्थ करून.

पृष्ठ–२

**यौगिक अर्थ**—शब्दाचा मूळचा अर्थ—उ० कुशल शब्दाचे दोन अर्थ आहेत. १ ला—कुश–दर्भ तोडणारा व दुसरा चतुर.पैकीं पहिला यौगिक अर्थ व दुसरा रूढार्थ.

वक्तृत्वाची थोडक्यांत व्याख्या—'वक्तृत्वाचे मुख्य लक्षण........... त्याचें नांव वक्तृत्व.'

**आदिपीठ**—मूलस्थान.

**देशांतराचे**—दुसऱ्या देशाचे ('अन्यः देशः देशान्तरम्' या विग्रहावरून) फ्रान्सची प्रख्यात राज्यक्रांति—ही इ. स. १७८९ मध्यें झाली.या राज्यक्रांतीनें नुसत्या फ्रान्सांतच गडबड झाली नाहीं तर तिच्या योगानें मोठमोठीं नवीं तत्वें जगांत प्रसृत झालीं.

पृष्ठ–४

**वाच्य अर्थ व व्यंजक अर्थ**—वाच्य म्हणजे शब्दांचा प्रथम वाचनानंतर लक्षांत येणारा सरळ अर्थ व त्या अर्थावरून पण वेगळा असा जो दुसरा अर्थ त्याच शब्दाचा, तो व्यंजक अर्थ उ०—'तूं फार शहाणा आहेस ! ' या वाक्यांत शहाणा या शब्दाचा वाच्यार्थ जो विद्वान तो येथें घ्यावयाचा नसून ' मूर्ख ' असा अर्थ घ्यावयाचा.

**प्रकृत**—हातीं घेतलेला, पुढें असलेला.

**अध्यात्मविद्येवरील**—तत्त्वज्ञानावरील.

पृष्ठ–७

**जगत्प्रलयावधि**—[ जगत् + प्रलय + अवधि ] जगाचा प्रलय-म्हणजे बुडणें-तों वेळपर्यंत. ष. त. समास.

" कित्येकांत देवाच्या पैगंबरांनीं......आश्वासन दिलें आहे–" या ठिकाणीं पैगंबराचा अर्थ—' प्रेषित-देवदूत ' असा घ्यावयाचा–इंग्रजींत यांस Prophet

म्हणतात. कांहीं देशांतील लोक ‘ आमचाच देश देवास आवडतो ’ असें जें हट्टानें प्रतिपादितात त्यांस उद्देशून हें खोंचून बोलणें आहे.

**देशैकनिष्ठा**--देशाशींच एकनिष्ठतेनें-एकत्वाच्या भावनेनें राहणें.

पृष्ठ–१०

**अंगविक्षेपादिक**--अभिनय, नाट्य. ( Acting ).

**थुसिडिडीज्**--हा सुप्रसिद्ध इतिहासकार आहे.

**विश्रुत**—प्रसिद्ध.

पृष्ठ–१३

“ ......सगळें मान एकदम फिरून गेलें...... ” येथें ‘ मान ’ चा अर्थ ‘ मत ’ या अर्थी लक्ष्य आहे. ‘ मान ’ चा खरा अर्थ ‘ वजन ’ असा होईल. व त्या अर्थींच बोलावयाचें असल्यास सगळें ‘पारडें’ फिरलें असें म्हणतां येईल.

पृष्ठ–१४

“ पण थोरपणामागें......छळ होतच असतो ” शास्त्रीबुवांनीं जातां जातां अर्थांतरन्यास अलंकारानें सुंदर विचार मांडला आहे.

पृष्ठ–१५

**सचोटीनें वहिवाटल्यावरून**—कुठेंहि अफरातफर न करतां त्याचा उपयोग केल्यावरून.

**घोरतर**--फार भयकर

पृष्ठ–१६

**बेबंदाई**-( बे + बंद + आई ) शब्द फारशी आहे. बे म्हणजे शिवाय-बंद म्हणजे **शिस्त** व ‘ आई ’ हा प्रत्यय. एकूण अर्थ,--ढिलेपणा. या प्रत्ययानें बनलेले आणखी शब्द मोगलाई, चढाई इ०.

“ आणि रोमशहराच्या........आल्प्सचे पहाड केले. ”–साधा अर्थ “ तो रोम सोडून आल्प्सच्या पलीकडे गेला. ” इंग्रजी पद्धतीवर वाक्यरचना आहे. “ He made Alpses between him and Rome. ”

पृष्ठ–१७

**शीघ्रलिपी**--‘ Shorthand ’ mathod; लघुलिपीही म्हणतात.

पृष्ठ–१८

**गोषवारा**--सारांश, मतलब.

**अभावास्तव**--नसल्यामुळें

**आधेयभूत**–आश्रयावर टिकून असणारी.

**प्रत्यय**--प्रचीति; अनुभव.

पृष्ठ–१९

**सुमाराचाच**--साधा, कमी प्रतीचा.

.........“ यांची वक्त्यांत बऱ्याच प्रतीची गणना आहे....” वक्ते या दृष्टीनें त्यांचा क्रमांक बराच वरचा आहे.

पृष्ठ–२२

‘ **जॉन्सन्** ’-प्रख्यात इंग्रज पंडित व टीकाकार. यानेंच अत्यंत परिश्रम-पूर्वक इंग्रजी भाषेंतील पहिला सुंदर शब्दकोश तयार केला. स्वभावानें जरासा हिरवट पण बुद्धीचा तिखट असा हा विद्वान् होता.

पृष्ठ–२३

**उत्पात—भयंकर प्रसंग** उ०–क्वेटा येथील भूकंप.

**धूमश्चक्री**—धामधूम

**चिळस**—शिसारी–( एकाद्या गोष्टीविषयींच्या बीभत्स कल्पनेनें ती गोष्ट पुढें येतांच अगर तिचें नुसतें नांव काढतांच ‘ कसेंसेंच ’ जे होतें त्यास ‘ चिळस ’ म्हणतात.

“ त्याप्रमाणेंच वरील प्रसंगींचें त्याचें वक्तृत्व.........रमणीय नाहीं–” वक्तृत्व ज्यावर करावयाचें तो प्रसंग बीभत्स असल्यानें त्याचा परिणामही मनोहर झाला नाहीं. विषय शुद्ध, तरच सांगणें रमणीय होईल.

**उज्ज्वल**—( उद् + ज्वल ) अत्यंत प्रकाशमय.

**भाड्यावारी**—मोलानें लावून.

पृष्ठ–२५

**पराकाष्ठा**—( परा + काष्ठा ) परा–शेवटची; काष्ठा–मर्यादा. म्हणजे कमाल मर्यादा.

“ असो तर याप्रमाणें.........जगांत चिरकाल चालतीलसे करून टाकले.” बर्क, शेरिडयान् प्रभृति वक्त्यांनीं सहजसुंदर भाषणें करून स्वतःचीं नांवें

जगाच्या इतिहासांत अजरामर तर करून ठेवलेंच आहेत पण ज्याच्यावर त्यांनीं वक्तृत्वाचें शस्त्र उगारलें तो लॉर्ड हेस्टिंग्सही,त्याचें नांव नेहमीं भाषणांत आल्यानें लोकांच्या लक्षांत राहणार आहे. व या अर्थी तोही चिरकाल प्रसिद्धच झाला आहे. रामरावणाच्या लढाईत रामाबरोबर रावणाचेंही नांव जसें येतें त्याप्रमाणें.

पृष्ठ-२६

**संस्कृत आणि असंस्कृत रूप**—संस्कृत म्हणजे बाह्यक्रियांचे संस्कार ज्यांचे वर झाले आहेत असे व असंस्कृत म्हणजे ज्यावर असे संस्कार नाहींत असे. उ० खाणींतून निघालेला हिरा, ' हिरा ' या नांवास शोभेसा असला तरी जोंपर्यंत त्याला पैलू पाडून चकचकीत केलें नाहीं, तोंवर तो असंस्कृत स्वरूपांत म्हणजे जरासा हीनच रहाणार. येथें पैलू पाडण्याची जी क्रिया तिला ' संस्कार ' म्हणावयाचें व अशा तऱ्हेनें पैलू पाडलेल्या हिऱ्यास संस्कृत 'हिरा' अशी संज्ञा देण्यास हरकत नाहीं.

**अनुकूळ नव्हती**;–शास्त्रीबोवांच्या वेळीं ' ल ' च्या ऐवजीं ळ 'हा वर्ण वापरण्याची प्रथा होती. सध्यां आपण ' अनुकूल ' असें म्हणूं.

'...या देशांत त्याचा **अभाव** पूर्वीपासून **नांदत** होता..." ' भाव ' व ' अभाव ' हे शब्द शास्त्रीय आहेत. ' भाव ' म्हणजे 'असणें' व अभाव म्हणजे 'नसणें.' मग कांहींही नसण्याची जी स्थिति म्हणजेही अभाव होय. या ठिकाणीं 'वक्तृत्वाचा गुण नसतानाची जी स्थिति असावी तीच फक्त होती असा अर्थ लक्ष्य आहे.

पृष्ठ–२७

' **होमर** '—प्रख्यात ग्रीक कवी

' **ईलियड्** '—रामायणासारखें प्रख्यात काव्य.

**वैमनस्य**–शत्रूपणा.

पृष्ठ–२८

"...वक्तृत्व' शब्दाच्या **आलीकडील अर्थास** अनुसरून..." वक्तृत्वशब्दाचा अलीकडील अर्थ प्रथमारंभींच जी व्याख्या केली आहे त्यांत दिला आहे. ' रामाकाळीं बोलण्याचे प्रसंग आले होते व ते त्या वेळच्या लोकांनीं पार पाडले पण त्यांच्या ठिकाणीं 'आपण हें भाषण करीत आहोंत ही **जाणीव** नव्हती व म्हणून त्यास अलीकडची ' वक्तृत्व, संज्ञा देतां येत नाहीं.

**शिल्पविद्या**—दगड, धातूसारख्या कठिण पदार्थांवर खोदून नक्षीकाम करणें अगर माती अगर शाडूपासून मूर्ति निर्माण करण्याची कला. आजिंठ्याचीं लेणी, शिवाजी पुतळा ( पुणें ), इ०

**गणमात्रा**—कवितेंत ताल व गेयता येण्यासाठीं केलेली योजना.

**अटाटाची**—त्रासाची, आटाआटीची.

पृष्ठ–२९

**वर्णोच्चारांची**—मूळाक्षरांच्या उच्चारण्याची

**अंगभूत**—शरीराबरोबरच जन्मलेली.

"...स्थलकालादिकांचीं अनुकूलताही यास लागत नाहीं" बोलतांना अमक्याच ठिकाणीं बोलतां येतें व अमक्याच वेळीं बोलतां येतें असें बंधन नाहीं. त्याच्या उलट चित्रकलेस स्थलकालाची जास्त अपेक्षा आहे.

**साहित्य**—सामान, सिद्धतेस लागणाऱ्या गोष्टी.

पृष्ठ–३०

**शब्दलालित्य**— चांगले, कानाला गोड लागणारे शब्द वापरणें

**अवसरास**—वेळेस.

"...पुरस्त्रीच्या आणि वन-स्त्रीच्या रमणीयत्वांत..."पुरस्त्री म्हणजे शहरांत राहून चालचलणुकीनें सुधारलेली अशी व वनस्त्री जरा सुंदर असली तरी तिला हें शहरी मोहकपणाचें सोंग न आणतां आल्यानें ती शहरांतील लोकांस जशी तितकी आवडत नाहीं त्याप्रमाणें दुसऱ्या भाषणाचें होईल.

पृष्ठ–३१

**स्वाभाविकत्व**—सहजपणा, साधेपणा.

**अप्रगल्भत्व**—निरागसपणा, निष्पापवृत्ति

**विभ्रम**—खेळ, मनाला मोह पाडणाऱ्या शारीरिक हालचाली.

**वाग्मी व वाग्विद्**—साधा अर्थ वक्ता !

**दर्शनें**—दर्शन म्हणजे शास्त्र, ज्यापासून ज्ञानदृष्टीचें साफल्य होतें तें. आपल्याकडे सर्वमान्य आस्तिक सहा दर्शनें आहेत.तीं:- पूर्वमीमांसा, वेदान्त, वैशेषिक, न्याय, योग, सांख्य.

**नैयायिक**—न्यायदर्शनाच्या आधारावर भांडणारा विद्वान्. न्यायशास्त्र 'गौतममुनी'नें रचलें !

पृष्ठ–३२

**अनुमानप्रमाण**--तर्कानें एकादी खरी गोष्ट सांगणें. मुख्य चार प्रमाणांपैकीं हें एक आहे. **प्रमाणें**–आप्त, प्रत्यक्ष, अनुमान व उपमान.

**मंडनमिश्र**—श्रीशंकराचार्यांनीं याला वादांत जिंकून हतप्रभ केलें !

**लोकवार्ता**—हकीकत.

पृष्ठ–३३

**आलेख्य**--चित्र.

**तूलिका**--कुंचला, Brush.

**असंभाव्य**--अशक्य.

**चकाकी**--चकचकीतपणा.

पृष्ठ–३६

......'कारण वक्तृत्व म्हणजे'...शास्त्रीबुवांनी वक्तृत्वाची सुंदर व्याख्या येथें दिली आहे. **आविर्भाव**–बाहेर दिसण्याची क्रिया.

पृष्ठ–३७

**पांढऱ्यावर काळे केलेले**—इंग्रजी झांक ' Somethingin black and white '

**विचित्रवैभव**—विशेष रीतीनें सुंदर असें वैभव म्हणजे शोभा.

**निर्णायक**—शेवटचे

पृष्ठ–३९

**ग्लानि**--मलीनता.

**कळा**—शोभा. पण अलीकडे याचा वाईट अर्थीच उपयोग करतात. उ॰ ' **देशास अवकळा**--आली ' ' चांगली कळा ' नव्हे !

पृष्ठ–४१

**विश्वकर्मा**—देवांचा शिल्पकार.

**घटावून गेलेले**—सरावून गेलेले.

**अनन्यभाव**—एकमेव भक्ति.

**मोहरा**--पुढारी, येथें तानाजी मालुसरा.

पृष्ठ—४२

**थर्मापिली**—या नांवाची खिंड आहे. तेथें इ. स. पूर्वी ४८० यावर्षी घनघोर युद्ध झालें. बाजीप्रभूंची घोड खिंड व ही खिंड यांच्यातील प्रसंगांत अत्यंत साम्य आहे.

पृष्ठ—४४

**ज्ञातीनिशीं**—स्वतः.

**जगती**—पृथ्वी.

'दुसऱ्या बाजीरावाचें वर्णन देतांना शास्त्रीबुवांची जळजळीत लेखणी कशी प्रभावानें कुरकुरते आहे हें दिसून येईल. रूपक व उपमांचा त्यांनीं या लहानशा भागांत नुसता खच पाडलेला आहे.'

पृष्ठ—४६

**दीपशलभन्याय**—यासच 'दीपपतंगन्याय' म्हणतात. पावसाळी किडे ज्याप्रमाणें दिव्याच्या दीप्तीस भुलून त्यावर झडप घालून स्वतःचा नाश करून घेतात त्याप्रमाणें.

**कपटोपक्रम**—कपट-खोटी वागणूक-करण्याचा घाट.

पृष्ठ ४७

**साडेतीन शहाणे**–'सखा देवा विठ्ठला.' असे तीन.

(१) सखाराम बापू बोकील (पेशव्यांकडील)

(२) देवाजीपंत चोरघोडे (नागपूरचे भोंसले यांजकडील)

(३) विठ्ठल सुंदर (निझामाकडील)

(४) नाना फडणवीस–'अर्धा शहाणा'

पृष्ठ ४८

**कालपाशाकृष्ट होत्साता**—काल म्हणजे यम त्याच्या पाशांनीं ओढला जाणारा.

पृष्ठ– ४९

**अमृतराय**—कीर्तनांत हरदासाच्या व श्रोत्यांच्या अत्यंत आवडीचे असे 'कटाव' रचणारे व कीर्तनाची प्रथा पाडणारे प्रख्यात कवी.

**जीवाचा**—जीव=बृहस्पति (देवांचे गुरु)

**सु-रस-खनि**—सु म्हणजे चांगल्या रसांची खनि म्हणजे खाणी असणारी वाणी–काव्यांतील हे रस नउ आहेत. तेः— 'शृंगारवीरकरुणरौद्रहास्यभयानकाः। बीभत्साद्भुतशांताश्च नव नाट्ये रसाः स्मृताः॥'

पृष्ठ– ५०

"राष्ट्रांची आयुस्थिति म्हणजे मनुष्याच्या आयुस्थितीसारखी होय."
'मनुष्याच्या बाल्यावस्थेंत ज्याप्रमाणें त्याला ज्ञान कमी असतें त्याप्रमाणें अजून उन्नतीच्या मार्गावर असलेलें राष्ट्रही अज्ञानांतच असतें!' (या वाक्याचा पूर्ण अर्थ शास्त्रीबोवांनीं त्याच स्तंभांत सुंदर विशद केला आहे)

पृष्ठ–५१

**चोज**—लाड, हांव इ.

**पिंड व ब्रह्मांड**—शरीर व विश्व.

पृष्ठ–५२

**व्यापार**—क्रिया.

**चित् आणि जड**—चित् म्हणजे चेतनायुक्त, ज्यांच्यांत हालचाल करण्याची प्रवृत्तीच आहे व या उलट जड पदार्थ म्हणजे जे अचेतन होत ते! शरीरांत जोंवर प्राण आहे म्हणजे चेतना आहे तोंवर तें चेतनायुक्त शरीर, प्राण निघून गेल्यावर राहील तें जड शरीर.

**अगोचर**—इद्रियांस न दिसणारी, (गो = इंद्रिय; बुद्धि)

"जिज्ञासा वृत्तीचा ...... तितका तिचा जोर अधिक!"

एकाद्या गोष्टीविषयीं पूर्ण माहिती असली म्हणजे त्या गोष्टीविषयींचें कुतूहल नाहींसें होतें, पण तेंच त्या गोष्टीविषयीं थोडीशी जरी संदिग्धता असली कीं वाटूं लागतें 'कीं, या गोष्टींत असावें काय?' मग माणूस श्रमाची पर्वा न करतां त्या गोष्टींतील गूढ शोधून काढण्याचा प्रयत्न करतो व त्याबाबतींत त्याला जितके जास्त श्रम पडतील तितके मग त्या गोष्टीच्या फळापासून त्याला सुख जास्त होतें.

**नियतकालिक**—ठरीव वेळेपर्यंत, मोजक्या काळपर्यंत.

"शरीरांतील जीवतत्त्वें.........परस्परांचा संबंध सुटला."

आपलें शरीर हे असंख्य परमाणूंच बनलेलें आहे. यदृच्छया हे परमाणू जवळ आल्यानें त्यांचें हें दृश्यरूप होते. या शरीरांतील प्राण नष्ट झाल्यावर पुनः हे परमाणू एकमेकांपासून दूर होतात व अशा योगानें शरीर नष्ट होतें. परमाणूंचीच पृथ्वी बनलेली आहे. तेव्हां शरीरांतील परमाणू सृष्टीच्या स्वरूपांत गेले कीं पृथ्वीचा व शरीराचा संबंध सुटला।

पृष्ठ–५३

**स्वाभाविक**–साहजीक.

**प्रवृत्ति**—प्रथा.

मराठ्यांच्या इतिहासावर लिहितांना शास्त्रीबोवांची जलाल लेखणी कशी ऐन उमेदीनें कुरकुरते हें पाहण्यासारखं आहे.

पृष्ठ–५६

**धात्वर्थ**--धातूपासून निघालेला अर्थ-(' कीर्तन' शब्द कीर्त्, कीर्तयति-वर्णन करणें यापासून झालेला आहे.)

**तादृश**—तितकी

पृष्ठ–५८

**अनधिकारास्तव**—अधिकार-हक्क-नसल्यामुळें. ब्राह्मणांनाच वेद-शास्त्रें वाचण्याचा अधिकार आहे असें धर्मांत सांगितलें आहे.

पृष्ठ–५९

**रघुनाथ कवी**—प्रख्यात ' नलदमयंति स्वयंवराख्यान ' या अजरामर काव्याचे जनक. पेशव्यांचे पदरचे राजकारणी कवी.

**साहित्य**—साधनें.

पृष्ठ–६०

**काव्यव्युत्पत्ति**—काव्य म्हणजे पूर्वीच्या महान् कवींनीं केलेले ग्रंथ व व्युत्पत्ति म्हणजे शब्दांचे मूळ कळवून देणारें शास्त्र.

**चंपू**—नाट्याचा एक प्रकार. उ०–' राधामाधव विलास ' चंपू.

**तात्कालिक लौकिक वृत्तांत,**—त्यावेळीं घडलेल्या मनोरंजक गोष्टींची हकीकत.

पृष्ठ–६१

**आख्यायिका**—[ आ + ख्या = सांगणें ] आठवण.

**विरक्त, रक्त**, विरक्त–वैराग्ययुक्त विरागी; आणि रक्त म्हणजे सांसारिक सुखांत मग्न झालेले. ( रक्त, मूळधातू रञ्ज = रमणें. )

पृष्ठ–६२

**ग्रंथविस्तारभयास्तव**—पुस्तकाचा आकार ( पृष्ठ संख्या ) फार होईल या भीतीनें.

**ऐकीव**—ऐकिलेल्यावरून,या प्रमाणेंच क्रियापदापासून 'जाणीव, नेणीव', इ० शब्द बनलेले आहेत.

पृष्ठ-६३

**उद्दीपन**—[ उद् + दीप् = प्रकाशणें ] उज्ज्वलन.

**मिथ्यात्वाविषयीं**—खोटेपणाविषयीं, असारत्वाबद्दल.

**असभ्य**—जो सभ्य नव्हे तो. [ सभ्य म्हणजे सभेंत-अर्थात् सुजनांच्या-बसण्यास जो योग्य तो ] म्हणजे सभ्य लोकांस न पटणारा.

पृष्ठ-६४

**विषयसुखाची अनर्थावहता**—ऐहिक क्षणभंगुर जे पदार्थ ते विषय होत. त्यांचेयोगें मिळणारें सुख अर्थातच क्षणिक व नाशवंत असणार म्हणून त्या तसल्या सुखाची अनर्थ म्हणजे नाशाकडे नेण्याची जी प्रवृत्ती ती.

**सकृद्दर्शनीं**—पहिल्या प्रथम.

**भर्तृहरीचीं तीन शतकें**—भर्तृहरी नामक संस्कृत कवीनें शंभर शंभर 'श्लोकाचें एक अशीं तीन काव्यें' रचिलीं आहेत. १ लें शृंगारशतक, २ रें नीतिशतक व तिसरें वैराग्यशतक. हीं शतकें अत्यंत गोड व परिणामकारी आहेत. मराठींत यांचीं भाषांतरें वामन पंडितानें केलेलीं आहेत.

पृष्ठ ६५

**जगन्नाथ पंडित**—संस्कृतांतलि शेवटचा व तेजस्वी कवी. 'भामिनी विलास' नांवाचें सुंदर काव्य रचिलें. यांतलि पहिल्या भागाचें नांव 'शृंगार-विलास' असून शेवटच्याचें 'शांत-विलास' असें आहे. यानें 'लवंगी' नांवाच्या यवनीशीं लग्न केलें होतें. तिला पावन करण्याकरतांच 'गंगालहरी' नांवाचें जगद्विख्यात काव्य यानें रचिलें असें म्हणतात. याचा काळ अकबर-जहांगिर बादशहाचें वेळेस होता.

पृष्ठ ६८

**सामाजिक**—समाजांतलि एक व्यक्ती.

**बहुश्रुतपणा**—पुष्कळ ज्ञान ऐकून आलेला शहाणपणा.

पृष्ठ-६९

"...तर याप्रमाणें जुन्या कवींच्या यशोरूप देहाचें जसें रक्षण केलें..." ही कीर्तनाची प्रथा पडल्यामुळें व हरिदासांनीच जुन्या कवितांचा वारंवार उपयोग

केल्यामुळें लोकांच्या दृष्टिपथांत ही कविता फार आली व अशा रीतीनें त्यांच यश म्हणजे ही कविता आयतीच राखिली गेली; व पुढें होणारे जे कवी त्यांचीही कविता आतां कीर्तनांत उपयोगिली जाणार असल्यानें तिलाही हें पोषकच झालें. अशा रीतीनें दोघांनाही या कीर्तनापासून नफाच झाला.

**चाहते**—'चहा'-वाहवा-करणारे भक्त.

निबन्धाच्या या शेवटल्या भागांत कीर्तनप्रकारापासून जुन्या व नव्या कवींस तसेच देशी भाषेस झालेले फायदे क्रमवार काढून दाखवलेले आहेत.

पृष्ठ-७१

**संपर्काचे**--संसर्गाचे.

**सुयंत्र**--यंत्राप्रमाणें सुव्यवस्थित; ठीक.

**वादास्पद**—[ वाद + आस्पद ] वाद करण्यास योग्य.

पृष्ठ-७२

कलम क्रमांक तीन, किंबहुना या पुढील दोन लेखांकांत शास्त्रीबुवांची उपहासात्मक भाषेची मजेदार चमक पाहावयास सांपडते. ज्या व्यक्तीविषयीं शास्त्रीबुवांना बोलावयाचें असेल त्या व्यक्तीला एकदम जाऊन भिडेल अशा तऱ्हेचा कडकडीत उपहास यांचा असतो. "कोणी रावसाहेब......नेहेमीं पुकारा होतच असतो." इत्यादि वाक्यांचा भडिमार कोणा रावबहादुराच्या व्याख्यानावर आहे हें सांगवत नाहीं.

पृष्ठ-७३

**प्रतिकूळ**--विरुद्ध, उलट.

' राजदरबार व देवालय......दोन मुख्य स्थानें होत. 'वक्तृत्वाचा उपयोग मागें पाहिल्या लेखांकांत वर्णिल्याप्रमाणें एक तर राजकारणांत होतो व आतां नुकतेंच सांगितल्याप्रमाणें धर्माच्या व्याख्यानप्रसंगीं होतो. व अशा उपयोगामुळेंच वक्तृत्वाचा उदय व उज्जीवनही या दोन्ही ठिकाणींच होतें ! राजदरबार व देवालय हीं दोन ठिकाणें राजकारण व धर्मकारण यांचीं अनुक्रमें दर्शक होत.

**आर्यसमाज**--संस्थापक-श्रीस्वामी दयानंदजी. हा पंथ उत्तर हिंदुस्थानांतच आहे. धर्मानुयायांची संख्या साधारण १॥ लाख आहे. त्यांना मूर्तिपूजा व जातिभेद मान्य नाहीं. वेद हेच मुख्य मानतात.

**प्रार्थनासमाज**--१८७० सालीं या पंथास न्यायमूर्ती रानडे व डॉ. भांडारकर मिळाल्यानें हा पंथ महाराष्ट्रांत रुजला. यांना पुनर्जन्म व वेद अमान्य आहेत. तरी तुकाराम, रामदास, इ० ना हे मानतात. ख्रिस्ती धर्माची शिकवण त्यांच्यावर जास्त प्रतिबिंबित आहे.

पृष्ठ-७४

**अभिज्ञता**—जाणतेपणा.

**बाळमित्र**—कै. सदाशिव काशिनाथ छत्रे यांनीं चालवलेलें मुलांचें मासिक.

**सुधारणुक**,—सुधारणा ( शास्त्रीबोवांच्या वेळचा विशिष्ट शब्द. )

पृष्ठ-७६

**सहा रिपूंचें प्राबल्य**,=काम क्रोध, लोभ मोह, मद, मत्सर हे सहा शत्रू ; त्यांचें प्राबल्य म्हणजे जोर.

**तीन मोठे कवि**—( १ ) होमर.-' इलियड ' व 'ऑडिसी'

( २ ) व्हर्जिल,-एनीड

( ३ ) मिल्टन.-' पॅरडाइज लॉस्ट ' हीं काव्यें.

या पानांतील वाक्यांचा परस्परांशीं विरोध व कांहीं ठिकाणीं साधलेला समतोलपणा पहाण्यासारखा आहे.

पृष्ठ-७७

**लौकिकांत**--बाहेरच्या व्यवहारांत.

पृष्ठ-८०

" पण उद्देशाची तारीफ नेहमीं होतेच असें नाहीं. "

वक्तृत्वसभेसंबंधानें हें बोलणें आहे. वक्तृत्वसभांचा उद्देश ती कला वृद्धिंगत करण्याचा आहे व तो अत्यंत इष्ट आहे; पण तो साध्य करण्यास लागणारें उद्योगाचें बळ जें खर्च होतें आहे तेंही चांगलेंच आहे हें म्हणणें खरें असणार नाहीं. कारण कीं, हा जो उद्योग चालला आहे, तो इष्ट मार्गानें चाललेला नाहीं असें शास्त्रीबुवांचें म्हणणें आहे. चांगला उद्देश सिद्ध करावयाला इष्ट व चांगल्या उद्योगाची गरज आहे.

पृष्ठ-८२

**विकार होणें**--छाप बसणें

**भरभर**,--भरभराट

**उपमर्द**--अपमान.

पृष्ठ-८५

**विभु रचणें**. व्यूह रचणें, बेत करणें

**अलनास्कर**—अरबी भाषेंतील सुरस गोष्टीमधील न्हाव्यानें सांगितलेल्या गोष्टींतील नायक. शेखमहंमदाप्रमाणें मनोराज्यें करण्यांत दंग झालेला गृहस्थ.

'**उत्तेजनास** ' **किंवा** ' **वर्धनास** '--हे शब्द त्या वेळच्या त्या सभेच्या पत्रकांतील आहेत.

**नेटिव**--एतद्देशीय, पण हा शब्द हिंदुस्थानांतील लोकांस प्रथम इंग्रजांनीं लावला. तें बरें होतें पण हाच शब्द पुढें आपले लोकच आपणांस लावूं लागले!

**चहा बुंद**–चहा व बुंद म्हणजे कॉफी.

या व पुढील पानावरील मजकूर किती सफाईदार व सहज रीतीनें लिहिलेला दिसतो, जणुं शास्त्रीबोवा बोलताहेत असा भास झाल्यासारखा वाटतो. बाजू जोरदार रंगविण्याची शास्त्रीबुवांची हातोटी, त्यांची निर्भीड पद्धति व भाषेची साहजिकता येथें पूर्ण प्रत्ययास अलेली आहे.

पृष्ठ-८६

**गौतम**--न्यायसूत्राचा कर्ता. ( इ. स. पू. ५०० सुमारें )

**व्यास**--महाभारत, अठरा पुराणें इ०चा कर्ता. ( इ. स. पू. ३०० )

**पाणिनी**—संस्कृत व्याकरणकार, अष्टाध्यायी कर्ता ( इ० स. पू. ८०० )

**रेफिल**---इटालींतील सुप्रसिद्ध चित्रकार. याच्या चित्रावरून चित्रें काढण्याची नवी पद्धति नंतरच्या चित्रकारांनीं काढली; एवढेंच नव्हें तर सर्व निसर्गाकडे पहाण्याची कलात्मक दृष्टीच यानें बदलली !

पृष्ठ-८७

......" वक्त्यांचे वर्ग हे......अशक्य होत. "

ज्याप्रमाणें हिरे हे कारखान्यांत कृत्रिम रीतीनें करणें शक्य नाहीं त्याप्रमाणें शाळा घालून उत्तम वक्ते निर्माण करणें हेंही शक्य नाहीं असें शास्त्रीबुवांचें म्हणणें. ( याच पानांत खालीं पुनः असलीच कल्पना आली आहे. )

पृष्ठ–८९

**विपन्न**—,( विपद्,-संकट यापासून ) संकटग्रस्त.

पृष्ठ–९०

**चर्मपत्रांत**— चामड्याच्या तुकड्यांत.

**किताब**—, पदवी ( फारशी शब्द )

**तरंग**—विचार.

पृष्ठ–९१

......" मूळच्या संकल्पांत व सिद्धींत पडलेली तफावत......" मूळचा मेकॉलेसाहेबानें ठरविलेला उद्देश व त्याप्रमाणें झालेली सांगता यांतील फरक. मूळ उद्देश असा कीं, इंग्रेजी शिकलेले नवे लोक इतरांसही तसेंच शिकवतील, पण झालें असें कीं,हे लोक स्वतः च्या चैनींत गुंग झाले व त्याचे इतर लोकांच्या शिक्षणाकडे लक्षच गेलें नाहीं. अशा तऱ्हेनें तो मेकॉलेचा उद्देश तडीस गेला नाहीं असें शास्त्रीबुवाचें म्हणणें !

पृष्ठ–९२

या शेवटच्या वाक्यांत पैशानेंच सर्व कामें होत नाहींत, त्याला स्वतःचे असें कांहीं भांडवल लागतें हें सांगण्याकरतां साधा वनस्पतींचा दृष्टान्त घेतलेला आहे. वनस्पतीला वाढ होण्यास जसें पाणी हवें पण नुसतें पाणी असूनही उपयोग नाहीं त्याला त्या वनस्पतीचें बीं प्रथम हवें. बियाशिवाय नुसत्या पाण्यावर आपोआप वनस्पती जशा उगवत नाहींत. त्याप्रमाणें वक्तृत्वगुण अंगांत असल्याशिवाय इतर बाह्य साधनांनीं त्याला फुलविण्याचा प्रयत्न करणें फोल आहे. प्रथम वक्तृत्वगुण आहे किंवा नाहीं, त्याची चौकशी करावी व नंतर तेथें त्याच्या वृद्धीचे प्रयत्न करावे असें शास्त्रीबुवाचें म्हणणें आहे.

पृष्ठ–९४

**लाखोगणती**—लाखांनीं गणती म्हणजे मोजणी आहे ज्यांची असे, एकंदर अर्थ पुष्कळ.

**कृतार्थता**—साफल्य.

पृष्ठ–९५

**जिनगर**--माती,शाडू इत्यादिकांच्या मूर्ती बनविणारे.

......"फार तर काय पण आमचे पुस्तकच त्याच एके रीतीनें **खंडनहोय**'

...या वाक्यांत स्वतःच्या पुस्तकाचा खरा व सात्विक अभिमान त्यांनीं प्रगट केला आहे तो योग्यच आहे.

पृष्ठ-९६

' महाकविप्रमाणें वक्तृत्व हा गुण देखील देवाकडूनच जन्मतः मनुष्यास प्राप्त होतो ' या मताचें खंडन शास्त्रीबुवांनीं पुढच्या परिच्छेदांत उत्कृष्ट रीतीनें सिद्ध करून दाखविलें आहे.

**संस्कारप्रयोगाची**--संस्कार म्हणजे विशिष्ट क्रिया. हिरा, मूळ स्थितींतून काढल्यावर त्याला पैलू जे पाडतात त्याला त्या हिऱ्याचें संस्करण म्हणतात.

**जन्मसिद्ध**--जन्मल्याबरोबरच तयार असलेले.

पृष्ठ-९७

**अर्थसंगति**--अर्थाची जुळवाजुळव.

**वक्तृत्ववृद्धीच्छु**—वक्तृत्वाच्या वाढीची इच्छा करणारे.

**अंगविक्षेप**—अभिनय.

पृष्ठ-९८

**यथार्थ बुद्धी करणें**--त्या त्या वक्त्यांचे खरे गुण लोकांना सांगून त्यांच्याविषयीं लोकांचें खरेंखरें व स्पष्ट मत करणें.

**अप्रमाण**--खोटे, पुरावा नसलेले.

**मुखश्री**—मुखवट्याची शोभा.

पृष्ठ-१००

......'श्रोत्यांच्या अज्ञानानें व अनभिज्ञतेनें किती..............' किंमत श्रोते-ऐकणारे-ठरवीत असतात; पण श्रोते जर अज्ञानी व अजाणते असले म्हणजे अर्थातच वक्त्याची किंमत त्याच्या खऱ्या किंमतीपेक्षां जास्त ठरते. त्याला उद्देशून हें लिहिणें आहे.

**वळवाचा पाऊस**—उन्हाळ्यामध्यें एकाएकीं गडगडून पडणारा पाऊस. हा फार वेळ टिकत नाहीं. पण जोराचा पडतो.

पृष्ठ-१०१

**औदासीन्य व दुजेभाव**--उदासीनता, निरुत्साह व परकीपणा.

**प्रतिष्ठा**--मोठेपणा.

पृष्ठ-१०४

या स्तंभापासून पुढें लेखांक संपेपर्यंत श्रीस्वामीदयानंद-आर्यसमाजाचे संस्थापक यांच्याविषयींचें शास्त्रीबुवांचें मत प्रकट झालें आहे. शास्त्रीबुवा निःस्पृह व प्रसंगविशेषीं कडक असत त्याचें प्रत्यंतर पुरेपूर पहावयाचें असल्यास एवढा भाग वाचला कीं पुरें! वस्तुतः पाहतां श्रीस्वामी दयानंदजीवर हा उपहासाचा ताशेरा जो इतका झडतो आहे तो अस्थानीं आहे. असेंही वाटण्याचा संभव आहे! शास्त्रीबुवांच्या मनाचा प्रश्न सोडून दिल्यास मात्र त्यांचा यापुढचा उपाहासात्मक भाषाविलास पाहण्यासारखा आहे.

**उपहास**—एकाद्याविषयीं निंदाव्यंजक बोलणें पण हें बोलणें तर असें असावें कीं, ज्याविषयीं आपण बोलतों आहोंत त्यांस त्याची जाणीव होऊं नये. यास उदाहरण, अत्तराचा फाया घेऊन त्यानें जर एकाद्यास टोंचलें तर शरीरास थोडीशी जाणीव होईल. पण तो फाया काढून घेतल्यावर टोंचलेल्या ठिकाणीं फक्त अत्तराचा वासच रहावा!

**विषाद**—खेद.

**भद्रपुरुष**—कल्याण (?) करणारे.

पृष्ठ-१०५

**निर्वाण, निर्ममत्व**—निर्वाण म्हणजे मोक्ष-व त्या मोक्षप्राप्तीपासून येणारी निःसंगता.

बरें झालें शास्त्रीबुवांस लवकर आठवण झाली म्हणून! नाहींतर विचाराच्या ओघांत किती वाहावले असते सांगतां यायचें नाहीं.

पृष्ठ-१०६

**सद्धर्मविवेचनेच्छु**—चांगल्या धर्माच्या विचाराची इच्छा करणारे. —न्या० रानड्याच्या विषयीं तर शास्त्रीबुवा बोलत नाहींत? —

पृष्ठ-१०८

**परिव्राजकाचार्य**—परिव्राजक म्हणजे संन्यासी, आणि त्यांतील आचार्य म्हणजे मुख्य. उपहासानें हें विशेषण योजलें आहे.

**पंडितंमन्य**—स्वतःस खोटेंच पंडित मानून घेणारा!

पृष्ठ-१०९

**अकांडतांडव**—तांडव हा नृत्याचा एक प्रकार आहे. हें नृत्य शंकराचें फार आवडतें आहे. (येथें 'वृथा गडबड' हा अर्थ.)

**धुरंधर, अध्वर्यु**—'धुरा म्हणजे जूं' धरणारे–, पुढारी.

**जुक्ति**–युक्ति– हिंदींत 'य' चा 'ज' होतो.

**अजेयत्वानें**—कोणी जिंकणारा नाहीं या भावनेनें.

पृष्ठ–११३

**ग्रंथ माजणें**—ग्रंथ मोठा होणें.

**अश्वमेध**—यज्ञाचा एक प्रकार, यांत घोड्याचा बळी देत असत. सगळें जग जिंकण्याची खूण म्हणून एकादा घोडा मोकळा सोडीत व कोणाचाही अटकाव न होतां तो परत आला की त्या घोड्याचा मालक दिग्विजयी ठरे!

श्रीरामानें केलेला अश्वमेध व लवानें अडविलेला घोडा याचें वर्णन विद्यार्थ्यांनीं वाचलें असेलच!

पृष्ठ–११४

**रसवंती, वाणी**--वाचा.

पृष्ठ–११५

**मडमांचें गल्लचूर्ण**,—साहेबलोकच पूर्वी तोंडास 'पावडर' लावीत असत,–गल्ल म्हणजे गाल त्यांवर लावण्याचे चूर्ण म्हणजे भुकटी.

**फल्ले**--सोंगे, पदर.

**परिपाक**--परिणाम.

'**मतलबसिंधू, गडबडाध्याय, गोलंकार**,'—हे शब्द उपहासानें वापरलेले आहेत–'धर्मसिंधू' म्हणण्याचे ऐवजीं यांचें ठिकाणीं स्वतःचा स्वार्थ होता असें शास्त्रीबुवांस म्हणण्याचें असल्यानें त्यांस 'मतलब-सिंधू' म्हटलें आहे.

शास्त्रीबुवांची भाषा ऐन बहारींत डौलानें कशी नटलेली आहे हें वरच्या लिखाणावरून दिसून येईल. एकाद्याची कींव करावयाची असली म्हणजे त्याच्या वर्मी बरोबर लागतील अशी शब्दयोजना शिकावयाची असेल, तर शास्त्रीबुवा-कडूनच शिकावी!

या विभागांत वक्त्याला लागणारे गुण जन्मतःच सिद्ध असलेले व प्रयत्नतः साध्य होणारे सांगण्यांत येणार आहेत.

पृष्ठ–११९

**हृदयवृत्ती**—हृदयाचा कल.

पृष्ठ-१२१

**भांगेंत तुळस**—वाईटांतून चांगली गोष्ट निघणें यास हें सांप्रदायिक वाक्य उपयोजितात.

पृष्ठ--१२२

**खुद्द खाशा स्वारीचाच**—गव्हर्नर जनरल हेस्टिंग्सचाच.

पृष्ठ-१२४

**उद्दामता**—तेजास्विता.

**पुराणांतील वांगीं पुराणांत**—जें पुराणांत वाचलें किंवा जें पुराणिकानें सांगितलें तें आचरणांत कोण पाळणार! उपदेश जागच्या जागींच राहतो आणि वर्तन मनुष्याच्या लहरीप्रमाणेंच घडत असतें!

—' मराठी म्हणीविषयीं चार शब्द '-वि. वा. भिडे.

**साधकबाधकप्रमाणें**--एकाद्या विषयासंबंधीं अनुकूल वा प्रतिकूल मुद्दे मांडणें यासच साधक-बाधक प्रमाण म्हणतात.

पृष्ठ-१२५

**बहुश्रुतत्व**--फार ऐकल्यामुळें आलेला शहाणपणा.

**फैसला**—निकाल.

पृष्ठ-१२६

**तार्किकता**--तर्काच्या आधारानें विषय समजावून सांगण्याची हातोटी.

**अर्थविशदत्व**--खोल अर्थ फोडून, विवरून स्पष्ट रीतीनें मांडण्याची पद्धत.

पृष्ठ-१२७

**लकाकी**,-तेज, पाणी.

पृष्ठ-१२८

"युरोपच्या स्थितिविशेषाला लागू ज्या गोष्टी त्या इकडे लागतीलच असें नाहीं ......" युरोपखंडांत जी गोष्ट होऊं शकेल तीच गोष्ट तशीच आशियाखंडांत होईल असें मानणें चुकीचें आहे. कारण प्रत्येक खंडाचे स्वतःचे असे विशेष असतात. उदाहरणार्थ युरोपखंडातील लोक स्वभावतःच थोडेसे आधिभौतिकवादी आहेत, तर आशियाखंडांतील लोक अध्यात्मांत शिरणारे आहेत हे त्या त्या खंडाचे विशेष होत. तेव्हां या विशेषाकडे दृष्टी ठेवून कोणतेही अमलांत आणावयाचे जे उपाय ते अमलांत आणावेत. 'सरसकट बारा टक्के' हें चालावयाचें नाहीं.

पृष्ठ-१२९

**अत्युक्तीचें**--अतिशयोक्तीचें.

समाप्त

# परिशिष्ट पहिलें

## —प्रश्नपत्रिका—

१ वक्तृत्वाची व्याख्या देऊन तिचा लोकसत्तात्मक राज्याशीं संबंध कितपत आहे हें दाखवा.

२ ' वक्तृत्वगुणाचा फैलावा होण्यास कोणत्या गोष्टी कारणीभूत होतात हें डेमॉस्थेनिसाचे उदाहरणावरून सिद्ध करा.

३ ' वक्तृत्वास कोणच्या परिस्थितीची, गुणांची व कालाची आवश्यकता आहे ' तें उदाहरणें घेऊन दाखवा.

४ ग्रीस, रोम यांतील वक्तृत्वाच्या शेवटच्या पायरीस पोंचलेल्या दोघां वक्त्यांची **तुलनात्मक दृष्टीनें** माहिती सांगा.

५ **टीपा लिहा** ( १ ) फिलिपिक् , ( २ ) हेस्टिंग्सवर आरोप, ( ३ ) क्याटिलैन कट, ( ४ ) बर्क, ( ५ ) सिसेरो, (६) सिनियस, ( ७ ) साडे तीन शहाणे.

६ ' वक्तृत्व ' गुणाच्या अभिवृद्धीची कारणें या व इतर कलांशीं या बाबतींत तुलना करा.

७ प्राचीन काळीं आपल्या इकडे ववतृत्व प्रगट होतें असें तुम्हांस वाटतें काय ? तसें कां वाटतें याचीं सोदाहरण कारणें तुम्ही देऊं शकाल काय ?

८ " वक्तृत्व कला ही स्वभावतःच अचिरस्थायी आहे " या विधानाची चर्चा करा. वक्तृत्वाची व्याख्या तुमच्या शब्दांत अलीकडील अर्थानें द्या.

९ बाजीराव, पहिले व दुसरे आणि शिवाजी यांना वक्ते म्हणतां येत असल्यास त्या तिघांच्या भाषणांत परिणामीं कोणकोणते गुण होते ? ' प्रसंगामुळेंच त्यांची वक्तृत्वबुद्धी जगांत चमकली' असें विधान केल्यास तुमचें त्यावर काय मत आहे ?

१० 'मनुष्याच्या करणीवरून त्याच्या अंगीं असणाऱ्या निरानिराळ्या गुणांचें अनुमान करतां येतें ' हें खरें आहे काय ? सोदाहरण सिद्धी द्या.

११ राजकारणाचे आधीं धर्मकारणाचा जन्म कां झाला व आपल्या देशांतच तो तसा कां व्हावा याचीं कारणें द्या.

१२ कीर्तनाची प्रथा कोणी पाडली ? तिचा उपयोग महाराष्ट्रास व देशभाषेस कसा झाला तें सविस्तर सांगा.

१३ " राष्ट्राची आद्यस्थिति ही मनुष्याच्या आद्यस्थितीसारखी असते " हें खरें आहे काय ? असल्यास कसें ?

१४. रामजोशी सोलापुरकर, अनंत फंदी व अमृतराय यांच्याविषयीं माहितीच्या थोडक्यांत टीपा देऊन रामजोशांच्या व अमृतरायाच्या कविता कशा प्रकारच्या होत्या तेंही थोडक्यांत लिहा.

१५. शास्त्रीबोवांच्या उपहासात्मक विवेचनपद्धतीचें वर्णन करा व उदाहरणादाखल थोडेसें लिहा.

१६. शास्त्रीबुवांच्या मनांत वक्तृत्वकलेपासून काय काय अपेक्षित कार्यें होतील असें होतें ? वक्तृत्व कला वाढवण्यास कोणच्या गोष्टींची मुख्य गरज आहे व ती कां हें सविस्तर सांगा.

१७ " राजदरबार किंवा देवालय हींच वक्तृत्वाचा प्रकाश होण्याचीं दोन मुख्य साधनें होत "–या वाक्याचा संबंध कोणाकडे आहे ? वरील विधानाचें सत्यत्व पटवून द्या.

१८ वक्तृत्वोत्तेजक सभेची माहिती देऊन अशा सभांचे उद्देश काय होते व ते कितपत सिद्धीस गेले या विषयींचें शास्त्रीबुवाचें मत द्या.

१९ शास्त्रीबुवांनीं केलेल्या वर्णनावरून तुम्हांस स्वतःस त्यांच्या वेळच्या काळाचें स्वरूपाबद्दल काय वाटतें ?

२० एतद्देशीय लोकांस इंग्रेजी शिक्षण देण्याबद्दल शास्त्रीबुवांचें काय मत होतें ? मेकॉलेसाहेबांचा ' हेतू ' कितपत सिद्धीस गेला असें त्यांचें म्हणणें आहे ?

२१ टीपा लिहाः—( १ ) बाबू केशवचंद्र सेन. ( २ ) रावबहादुर रानडे, ( ३ ) स्वामी दयानंद. ( ४ ) बाबू प्रतापचंद्र.

२२ वक्त्यास अत्यंत आवश्यक गुण कोणते व ते प्रयत्नानें माणसास साध्य करून घेतां येतील काय ? सोदाहरण सांगा.

२३ या कलेपासून मानवजातीस काय फायदा झाला ? ' वाक्शस्त्राचें तीव्रत्वही प्रतिपक्षी जनास अत्यंत भयावह असतें ' हें कसें काय ?

२४ शास्त्रीबुवांची भाषाशैली कशी काय आहे ? त्यांच्या भाषेंतील वैशिष्ट्य तुम्ही दाखवूं शकाल काय ?–

२५ ' वक्तृत्व ' निबंधाच्या एकंदर उठावाबद्दल तुमचें काय मत आहे ? निबंध बांधणींत ढिसूळ आहे असें तुम्हांस वाटतें काय ?

---

# मॅट्रिक मराठी गाईड.

लेखकः–**दत्तो रामचंद्र कानेगांवकर** बी. ए. (ऑनर्स)

मुंबई विद्यापीठानें १९३६-३७ सालांकरतां नेमलेल्या संपूर्ण अभ्यासक्रमावर विद्यार्थ्यांस अत्यंत उपयोगी, थोडक्या वेळांत भरपूर माहिती देणारें असें हें गाईड आहे. प्रत्येक पुस्तकावर भरपूर प्रश्न देऊन ते सोडवून दिलेले आहेत. शिवाय अर्थाच्या टीपा व टीका, मार्मिक व सोप्या भाषेंत दिलेल्या आहेत. प्रत्येक पुस्तकाचा सारांश दिल्यानें याची उपयुक्तता फारच वाढली आहे. व्याकरण, छंद, अलंकार, समास, व्युत्पात्ति इ० साठींही वेगळीं ३०–४० पृष्ठें घातलीं असून विद्यापिठाचे धर्तीवर पेपर्स देऊन ते सोडवून देण्याची सोपी रीत सोबत जोडली आहे. अशा रीतीनें प्रत्येक विद्यार्थ्यास अत्यंत आवश्यक असें हें 'गाईड' झालेलें आहे. इतकें असून २०० पानांच्या या पुस्तकाची किंमत अवघी एक रुपया. आमचा वक्तृत्व निबंध घेणारास हें 'गाईड' पाऊण पट किंमतीस देऊं. वक्तृत्व निबंधास जोडलेलें 'कुपन' भरून दिल्यास ज्या बुकसेलरकडून तें पुस्तक घेतलें असेल त्याच्याकडून हें गाईड पाऊणपट किंमतीस मिळेल, अगर चित्रशाळा पुणें या पत्त्यावरहि मिळूं शकेल.

कुपन–येथें फाडावें

श्री. रा. रा. मॅनेजर चित्रशाळा प्रेस, पुणें–यांसी—

सा. न. वि. वि.

मला तुम्ही प्रकाशित केलेलं 'मॅट्रिक मराठी गाईड' हवें आहे. सोबत बारा आण्यांचीं तिकिटें–मनिऑर्डर–पाठवीत आहे. बुक पोष्टानें रवाना करावें. क. लो. हे. वि.

माझा पत्ता.—

**पूर्ण नांव** ______________________

**पत्ता** ______________________

**गांवाचें नांव** __________ **पोष्ट** __________